GR-20040408.18.2110.001-0100

भागासवर्गीयांच्या सेवाभरती व सेवेविषयी आदेश निर्गमित करण्यापूर्वी सामान्य प्रशासन विभागाची सहमती घेण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांकः बीसीसी-२०००/२६५५/१६ ब,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १८ जुलै २००१

वाचा: सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः बीसीसी-२०००/२६५५/१६-ब, दिनांकः १० नोव्हेंबर, २०००.

संदर्भाधीन परिपत्रकान्वये मागासवर्गीयांच्या सेवाविषयक अथवा इतर कोणत्याही सेवाविषयक बाबी संबंधीचे आदेश सामान्य प्रशासन विभागाची सहमती घेतल्यानंतर निर्गमित करण्यात यावे, अशा सूचना दिलेल्या आहेत.

या आदेशाच्या अनुषंगाने काही कार्यालयांनी तसेच विभागाकडून कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या करण्याकरीता तसेच पदे भरण्याकरिता अनुमती देण्याबाबत या विभागाकडे विचारणा करण्यात येत आहे. या संदर्भात असे स्पष्ट करण्यात येते की,मागासवर्गीयांच्या सेवाविषयक बाबींचा संबंध येऊ शकेल असे धोरणात्मक निर्णय घेण्यापूर्वी मंत्रालयीन विभागांनी सहमती घेणे आवश्यक आहे. तथापि, जर रिक्त पदे भरण्यास शासनाची अनुमती असेल तर अशीच पदे विहित कार्यपध्दतीस अनुसरुन भरण्यास, पुन्हा या विभागाची सहमती घेण्याची आवश्यकता नाही. तसेच सेवाविषयक अन्य बाबींसंदर्भातील विहित नियमांतील तरतुदींप्रमाणे कार्यवाही करण्यासाठी या विभागाची सहमती घेण्याची आवश्यकता नाही.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(जी.के.राऊत)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी प्रकल्प,
सर्व जिल्हा सेवायोजन अधिकारी,
मंत्रालय विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग,
प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.

---x---

C:\My Documents\VAIDYA\Sirtaan-B